**यवतमाळ येथील मॉडेल करिअर सेंटर करिता निधी उपलब्ध करुन देणे**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उदयोजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कौविउ-२०१७/प्र.क्र.२४/रोस्वरो-१**
२ रा मजला मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३० मार्च,२०१७

**वाचा -**

1) **शासन निर्णय क्रमांकः कौविउ-२०१५/प्र.क्र.११८/भाग-२/रोस्वरो-१ दि.२० जानेवारी,२०१६**
2) **आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांचे पत्र क्र. कौविरोवउसं-९/मॉकसे/१७८१८ दि.३० नोव्हेंबर,२०१६**
3) **रोजगार व प्रशिक्षण महानिदेशालय, श्रम व रोजगार मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र डीजीईटी-व्ही-११०११/०१/२०१४/एमएमसेल-महाराष्ट्र (यवतमाळ) दि.२६.१०.२०१६**
4) **शासन निर्णय क्रमांकः वित्त विभागाचे शासन परिपत्रक, संकिर्ण-२०१६/प्र.क्र.९४/का-१४११ दि.०५ ऑगस्ट,२०१६**
5) **आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांचे पत्र क्र. कौविरोवउसं-९/मॉकसे/८८४ दि.०१ फेब्रुवारी,२०१७**

**प्रस्तावना -**

शासन निर्णय, कौविउ.२०१५/प्र.क्र.११८/भाग-२/रोस्वरो-१ दि.२० जानेवारी,२०१६ अन्वये राज्यात यवतमाळ येथील जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्राचे रुपांतर मॉडेल करिअर सेंटर मध्ये करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर योजनेस्तव केंद्र शासनाच्या श्रम व रोजगर मंत्रालयाच्या रोजगार व प्रशिक्षण महानिदेशालयामार्फत एकूण रु.३८,०१,२६१/- (रुपये अडतीस लाख एक हजार दोनशे एकसष्ट फक्त) एवढे अनुदान मंजूर करण्यात आले. प्रथम टप्प्यात सन २०१५-२०१६ मध्ये सदर रक्कमेपैकी ६०% अनुदान रु.२२,८०,७५७/- (रुपये बावीस लाख ऐंशी हजार सातशे सत्तावन्न फक्त) एवढी रक्कम वितरीत करण्यात आली. सन २०१६-२०१७ मध्ये सदर योजनेसाठी दुस-या टप्प्यात रोजगार व प्रशिक्षण महानिदेशालय, श्रम व रोजगार मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये रु.७,६०,२५२/- (रुपये सात लाख साठ हजार दोनशे बावन्न फक्त) एवढी रक्कम वितरीत करण्यात आली आहे. राज्य शासनाकडून सदर योजनेस्तव सन २०१६-२०१७ च्या अर्थसंकल्पात रु.५,००,०००/- एवढी तरतूद करण्यात आल्याने, सदर योजनेसाठी आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाच्या दि.०१ फेब्रुवारी,२०१७ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार सन २०१६-२०१७ मध्ये सदरचे सेंटर चालविण्याकरिता येणा-या खर्चासाठी, तसेच सदर योजना राबविण्यासाठी केंद्र शासनामार्फत नियुक्त केलेल्या यंग प्रोफेशनलला दयावयाचे मानधन व भत्ते यापोटी येणारा खर्च भागविण्यासाठी मार्च,२०१७ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात रु.३,६०,०००/- (रुपये तीन लाख साठ हजार फक्त) ची पुरवणी मागणी सादर करण्यात आली . सदर पुरवणी मागणीचा समावेश सुधारीत अंदाज २०१६-२०१७ मध्ये करण्यात आल्याचे वित्त विभागाने दि.२३.३.२०१७ रोजी अवगत केले आहे. सबब रु.३,६०,०००/- (रुपये तीन लाख साठ हजार फक्त) एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आयुक्त, कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता संचालनालय यांच्या दि.३० नोव्हेंबर,२०१६ व दि.०१ फेब्रुवारी,२०१७ च्या पत्रास अनुलक्षून मॉडेल करिअर सेंटर, यवतमाळसाठी सन २०१६-२०१७ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला रु.३,६०,०००/- (रुपये तीन लाख साठ हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्यात येत आहेत. सदर निधीची परिगणना खालीलप्रमाणे करण्यात आली आहे.

| अ.क्र. | शीर्ष | रक्कम (रुपये मध्ये) |
|---|---|---|
| १. | मॉडेल करिअर सेंटर, यवतमाळ येथील यंग प्रोफेशनल च्या मानधनासाठी सन २०१५-२०१६ मध्ये श्रम व रोजगार मंत्रालय, केंद्र शासन यांनी मंजूर केलेला निधी | २,४९,०००/- |
| २. | मॉडेल करिअर सेंटर, यवतमाळ साठी सन २०१६-२०१७ मध्ये श्रम व रोजगार मंत्रालय, केंद्र शासन यांनी मंजूर केलेला निधी | ७,६०,२५२/- |
| ३. | एकूण (१)+(२) | १०,०९,२५२/- |
| ४. | (-) सन २०१६-२०१७ मध्ये मॉडेल करिअर सेंटर य योजने मधील यंग प्रोफेशनलच्या मानधनासाठी करण्यात आलेली तरतूद | ५,००,०००/- |
| ५. | (-) मॉडेल करिअर सेंटर, यवतमाळ येथे नियुक्त यंग प्रोफेशनल प्रत्यक्षात दि.२३ जानेवारी,२०१७ पासून रुजू झाल्याने त्यांचे दि.२३ जानेवारी,२०१७ मे दि.३१ मार्च,२०१७ चे अपेक्षित मानधन रु.१,००,०००/- वगळता उरणारी रक्कम | १,४९,०००/- |
| ६. | पुरवणी मागणीची रक्कम (३-(४+५)) | ३,६०,२५२/-<br>रु.३,६०,०००/- (रु.तीन लाख साठ हजार फक्त) |

२. सदर रक्कम सन २०१६-२०१७ मध्ये मॉडेल करिअर सेंटर, यवतमाळ ही योजना राबविण्यासाठी येणारा खर्च भागविण्यासाठी, तसेच सदर योजनेस्तव रोजगार व प्रशिक्षण महानिदेशनालय, श्रम व रोजगार मंत्रालय, केंद्र शासन यांच्याकडून नियुक्त केलेल्या यंग प्रोफेशनलचे सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षातील मानधन व भत्ते देण्यासाठी खर्च करण्यात यावी. तसेच सदर रक्कम मागणी क्र-झेड-०१ प्रधान लेखाशीर्ष २२३०- कामगार व सेवायोजन,०२ सेवायोजन सेवा, (००१) संचालन व प्रशासन , (०१) कौशल्य विकास, रोजगार व संचालनालय ( सेवायोजन संचालनालय) , (०१)(१०) मॉडेल करिअर सेंटर (२२३० अे ०११) (योजनांतर्गत) ३१, सहायक अनुदाने ( वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.असंक्र ५३/१४७१ दि.१८.२.२०१७ व वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. १५४/अर्थ १८/१७ दि.२०.०३.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१७३८२४६१०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

S.G. Patil

Digitally signed by S.G. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SDED, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f64f9296da4ba15d02d3ad3826a21a74ed080355ac04eef5617c3b4f08af47ae, cn=S.G. Patil
Date: 2017.03.30 17:41:29 +05'30'

**(सं.गि.पाटील)**
उप सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखा व लेखापरीक्षा) ½ मुंबई/ नागपूर
२. अवर सचिव , MMPcell, रोजगार महानिदेशालय, श्रम व रोजगार मंत्रालय,भारत सरकार, ३/१० जाम नगर हाऊस, शहाजहान रोड, नवी दिल्ली-११ ००११
३. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय,कोकणभवन,नवी मुंबई
४. सहायक संचालक, जिल्हा कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र , यवतमाळ
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय,ठाणे/यवतमाळ
६. अपर कोषागार अधिकारी, उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/यवतमाळ
८. कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.कार्यासन अधिकारी (रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई
११.निवडनस्ती (रोस्वरो-१)